प्रवरा उजवा कालवा साखळी क्र. ३२/६१० वरील वितरीका क्र. २९ व साखळी क्र.३३/२५० वरील वितरीका क्र. १ च्या पुनर्स्थापना व नुतनीकरणाच्या बांधकामास विशेष दुरूस्तीचे कामाअंतर्गत प्रशासकिय मान्यता प्रदान करणे बाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
**शासन निर्णय क्रमांक : सीडीए -२०२१/प्र.क्र.९८/२१/लाक्षेवि (कामे)**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३१/०३/२०२२

**वाचा :-**

१. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र जा.क्र./गोमपाविम/सिंचन-१/७५४२, दि. १६.०८.२०१८.
२. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र जा.क्र./गोमपाविम/सिंचन -१/धा-२०१/२०४६, दि. १०.०३.२०२१
३. शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/२७/२०१६/लपा-०२, दि.२६/०५/२०१७.
४. शासन निर्णय - २०१७/५६६/१७/सिंव्य (कामे), दि.३१/०८/२०१८.
५. शासन निर्णय-संकीर्ण-२०१८/प्र.क्र.५५१/१७/सिंव्य (कामे) दि. २७/११/२०१८.

**प्रस्तावना-**

प्रवरा नदीवरील भंडारदरा धरणा पासून सुरु होणारा ४४.८० कि.मी. लांबीचा प्रवरा उजवा कालवा व ७६.८० कि.मी. लांबीचा प्रवरा डावा कालवा, या कालव्यांची कामे सन १९२६ ते १९३० या कालावधीत ब्रिटीश राजवटीत पूर्ण झालेली आहेत. प्रवरा उजव्या व डाव्या कालव्याद्वारे अहमदनगर जिल्ह्यातील संगमनेर, श्रीरामपूर, नेवासा व राहुरी या तालुक्यातील मिळून एकूण २३०७७ हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ मिळतो.

मा.उच्च न्यायालयाने दिनांक २३/०९/२०१६ चे दिलेल्या निर्देशानुसार पाणी वितरण प्रणाली योग्य व सक्षम होण्यासाठी सदर प्राप्त प्रस्तावानुसार भंडारदरा मोठा प्रकल्प ता. अकोला जि. अहमदनगर अंतर्गत असणा-या प्रवरा उजवा कालवा साखळी क्र. ३२/६१० वरील वितरीका क्र. २९ व साखळी क्र.३३/२५० वरील वितरीका क्र. १ च्या पुनर्स्थापना व नुतनीकरणाची विशेष दुरूस्ती अंतर्गत कामे करण्याची नितांत आवश्यकता आहे. यानंतर शेतकऱ्यांकडून करण्यात येणाऱ्या सिंचन व्यवस्थापनासाठी पाणी वापर संस्था स्थापित व हस्तांतरित करणे शक्य होईल.

संगमनेर, श्रीरामपूर, नेवासा व राहुरी इ. महत्वाच्या शहरांचा तसेच ग्रामपंचायतींचा पाणीपुरवठा, साखर कारखाने व औद्योगिक क्षेत्रास पाणी पुरवठा इ. बाबी लक्षात घेऊन प्रवरा कालव्यांवरील वहनव्यय कमी करण्याच्या दृष्टीने, कालव्याचा आवर्तन कालावधी कमी करुन वहन क्षमता वाढविणे तसेच जुन्या बांधकामांना जवळजवळ ९० वर्षे झाल्याने त्यांचे मधून मोठ्या प्रमाणात गळती सुरू झाल्याने त्यांचे मजबुतीकरण/दुरुस्ती करणे

अथवा कालव्यांचे नव्याने बांधकाम करणे गरजेचे आहे.त्या अनुषंगाने प्रवरा उजवा कालवा साखळी क्र. ३२/६१० वरील वितरीका क्र. २९ व साखळी क्र.३३/२५० वरील वितरीका क्र. १ च्या नुतनीकरणाचे येथील बांधकामास विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .त्यानुसार शासन पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद अंतर्गत प्रवरा उजवा कालवा साखळी क्र. ३२/६१० वरील वितरीका क्र. २९ व साखळी क्र.३३/२५० वरील वितरीका क्र. १ च्या कामाप्रित्यर्थ रुपये ३,९५,३३,९२२/- (रु. तीन कोटी पंचान्नव लक्ष तेहतीस हजार नउशे बावीस फक्त) व इतर अनुंषगिक खर्च रू. ६३,२५,४२८/- ( रु. त्रेसष्ट लक्ष पंचवीस हजार चारशे अठ्ठावीस फक्त) एकुण रुपये ४,५८,५९,३५०/- ( रु. चार कोटी अठ्ठावन्न लक्ष एकोणसाठ हजार तीनशे पन्नास फक्त) किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता खालील अटी व शर्तींचे अधिन राहून देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

i) शासन परिपत्रक क्र. प्रमा- २०१३ / ( ७८५/१३) / सिं / व्य (कामे ) , ०१/०१/२०१५ मधील मार्गदर्शक सुचनांचे पालन करणे , अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे महामंडळावर बंधनकारक आहे.

ii) तांत्रिक मान्यतपूर्वी बांधकामाचे सविस्तार सर्वेक्षण व संकल्पनावर आधारीत तरतुद करण्याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील .

iii) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पनेत दर सुची बाहयबाबी व वहन अंतरे तपासून अंदाजपत्रकास सक्षम स्तरावर तांत्रीक मान्यता प्रदान करावी.

iv) महाराष्ट्र सिंचन अधिनियम, २००५ नुसार सिंचन पध्दतीचे शेतक-यांकडून व्यवस्थापन लागू (MMISF) करण्याबाबत स्थापित पाणी वापर संस्थांचे संबंधित पदाधिकारी व क्षेत्रिय अधिकारी यांनी संयुक्त पहाणी करून त्यांनी व लाभक्षेत्रातील पाणी वापर सदस्यांना विश्वासात घेऊनच वितरण प्रणालीच्या विशेष दुरूस्तीसाठी आवश्यक तरतुद करणे. प्रकल्पावरील पाणीवापर संस्थेकडे संपूर्ण लाभक्षेत्र हस्तांतरणाचे कालबध्द नियोजन काम सुरु करण्यापूर्वी करावे. तद्नंतरच निविदा प्रक्रिया कार्यवाही हाती घेण्यात यावी.

v) प्रस्तावित वितरण प्रणालीच्या विशेष दुरूस्तीचे कामे पूर्ण झाल्यानंतर संपूर्ण लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस विहित कालमर्यादेत हस्तांतरण करणं याची जबाबदारी पुर्णपणे अधीक्षक अभियंता यांची राहील.

vi) मातीकामे व गवत झाडे / झुडपे काढण्याची कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रीकी विभागाकडील उपलब्ध मशिनरीने करावीत.

vii) प्रस्तावीत कामांमुळे खोदकाम / तोडफोड उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी .

viii) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा.

ix) सदरची कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्या बाबत पूर्णत्वाचा अहवाल शासनास त्वरीत सादर करावा. विषायांकीत प्रशासकिय मान्यता अंदाजपत्रकातील तरतुदी , दर, वहनअंतर, संकल्पना व इतर तांत्रिक निकष याबाबतची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रीय मुख्य अभियंता व अधिक्षक अभियंता यांची राहील.

x) सदर प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रकातील कामासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजुर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादे बाहेर जाऊन निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलीत शासन निर्णय , CWC ची मार्गदर्शक तत्वे , वित्तीय अधिकार मर्यादा, विहीत केलेली निवीदा कार्यपध्दत याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

प्रस्तावित कामासाठी होणारा ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (१२)(०४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (उत्तर महाराष्ट्र विभाग) (कार्यक्रम) (४७०१ जे १९४ ) ५४, गुंतवणुका या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/२७/२०१६/लपा-०२, दि.२६/०५/२०१७ अन्वये विशेष दुरुस्ती कामास आंतरवित्त सल्लागार यांचे सहमतीने मान्यता देण्याबाबतचे अधिकार जलसंपदा विभागास आहेत.

त्याअनुषंगाने आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव यांच्या सहमतीने शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता लाक्षेवि (कामे) कार्यासनाच्या नोंदवही सन २०२१-२२ मध्ये अ.क्र. ९ वर नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३११९३८०३८४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PURNIMA DEVANG DESAI

Digitally signed by PURNIMA DEVANG DESAI
DN: CN = PURNIMA DEVANG DESAI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2022.03.31 19:41:41 +05'30'

**( पुर्णिमा देसाई )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,

२. मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे कार्यालय,
४. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष,विधानसभा,विधानभवन,मुंबई,
५. मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन,मुंबई,
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई,
७. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई,
८. मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९. मा.राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई,
१०.प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
११.सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१२.सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई,
१३.महालेखापाल-१ (लेखा व अनूज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१४.महालेखापाल-२ (लेखा व अनूज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१५.कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद,
१६.मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश ,नाशिक
१७.आंतरवित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१८. अधिक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नाशिक,
१९.कार्यकारी अभियंता, नाशिक पाटबंधारे विभाग, नाशिक,
२०.सिं.व्य.(कामे) कार्यासन संग्रहार्थ.

## शासन निर्णय क्रमांक : सीडीए -२०२१/प्र.क्र.९८/२१/लाक्षेवि (कामे)

AHMEDNAGAR IRRIGATION DIVISION, AHMEDNAGAR

MAINTENANCE & REPAIRS OF PRAVARA RIGHT BANK CANAL

**Ch 32/610 Minor no. 29 & Ch 33/250 Minor No. 1**

**( WUA No. 20 )**

GENERAL ABSTRACT

| SR.NO. | NAME OF SUB ESTIMATE | Amount in Rs. |
|---|---|---|
| D | Regulator | 7303694.00 |
| F | RHT Works | 1379665.00 |
| G | Bridges | 13575613.00 |
| L | Earthwork & Lining | 17274950.00 |
| | Total Rs. | 39533922.00 |
| | Add 1% for Insurance | 395339.22 |
| | Add 3% for Contingency | 1186017.66 |
| | Add 12% for GST on Work Portion | 4744070.64 |
| | Total Rs. | 45859349.52 |
| | Say | 45859350.00 |

PURNIMA DEVANG DESAI

Digitally signed by PURNIMA DEVANG DESAI
DN: CN = PURNIMA DEVANG DESAI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2022.03.31 19:41:54 +05'30'

( Purnima Desai )

Deputy Secretary

Government of Maharashtra